**पदविधर/पदविकाधारक सुशिक्षित बेरोजगारांना शासकीय सेवेतील महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील गट-क मधील पदांवर नियुक्ती देण्याबाबत विहित संगणक ज्ञानाची अर्हता प्राप्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय, क्र.पअंक-१००१/७२४/प्र.क्र.५४/२००१/१६-अ
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ३१ ऑगस्ट,२००२.

संदर्भ :- १) शा. नि., सा.प्र.वि., क्र.पअंक-१०९७/१७९३/प्र.क्र.४/९८/१६-अ, दि.१९.३.९८.
२) शा.नि. सा.प्र.वि., क्र.पअंक-१०९७/१७९३/प्र.क्र.४/९८/१६-अ, दि.२०.५.९८.
३) शा.नि, सा.प्र.वि., क्र.पअंक-१०९७/१७९३/प्र.क्र.४/९८/१६-अ, दि.२३.९.९८.
४) शासन अधिसूचना, सा.प्र.वि., क्र.सेप्रनि-१०९८/प्र.क्र.७/९८/१२, दि.२५.१.१९९९
५)शासन परिपत्रक, सा.प्र.वि., क्र.सेप्रनि-१०९८/प्र.क्र.७/९८/१२, दि.३.५.२०००.
६)शासन निर्णय, सा.प्र.वि., क्र.प्रशिक्षण-१०००/१४३/३९, दि.१० जुलै,२०००.
७)शा. नि., सा.प्र.वि., क्र.प्रशिक्षण-२००१/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.७ ऑगस्ट,२००१.
८) शा.नि., सा.प्र.वि., क्र.पअंक-१००१/७२४/प्र.क्र.५४/२००१/१६-अ, दि.९ मे,२००२.

## शासन निर्णय

ज्या पदवीधर/पदविकाधारक सुशिक्षित बेरोजगार उमेदवारांना दि.१८.१.२००० पर्यंत रोजगार व स्वयंरोजगार विभागाकडून अनुभवाचा दाखला देण्यात आला आहे व त्यामधील जे उमेदवार शासकीय सेवेतील गट क मधील पदांवर (वाहन चालक वगळून) नियुक्तीच्यावेळी संगणक ज्ञानाची विहित अर्हता धारण करीत नसतील, अशा दि. ३० जून, २००२ पर्यंत नियुक्त झालेल्या उमेदवारांना सदर संगणक ज्ञानाची अर्हता नियुक्ती झाल्याच्या दिनांकापासून एक वर्षाच्या मुदतीत प्राप्त करणे आवश्यक राहील, असे आदेश संदर्भाधीन क्रमांक ८ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले होते. परंतू या सवलतीचा फायदा फारच कमी उमेदवारांना झाला असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. या सवलतीमध्ये बदल करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार शासन आता पुढील प्रमाणे आदेश देत आहे.

२. ज्या पदवीधर / पदवीकाधारक सुशिक्षित बेरोजगारांना "सुशिक्षित बेरोजगारांना अर्थसहाय्य" योजनेअंतर्गत दि.१८.१.२००२ पर्यंत तीन वर्ष अंशकालीन काम केल्यानंतर अनुभवाचा दाखला देण्यात आला आहे व त्याची नोंद रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रात झाली आहे व त्यामधील जे उमेदवार शासकीय सेवेतील महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील गट-क च्या पदावरील (वाहन चालक वगळून) नियुक्तीच्यावेळी संगणक ज्ञानाची खालील विहित अर्हता धारण करत नाहीत अशा नियुक्त झालेल्या उमेदवारांना विहित केलेली संगणक ज्ञानाची अर्हता नियुक्तीच्या दिनांकापासून एक वर्षाच्या मुदतीत प्राप्त करण्याची सवलत या शासन निर्णयाव्दारे देण्यात येत आहे. या कालावधीत संबंधित उमेदवारांनी विहित संगणक ज्ञानाची अर्हता प्राप्त केल्याचे प्रमाणपत्र नियुक्ती प्राधिकाऱ्यांना सादर करणे आवश्यक आहे. अन्यथा हा कालावधी संपताच संबंधित कर्मचाऱ्याची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल. संगणक अर्हता प्राप्त करण्यासंबंधिचे सदर प्रमाणपत्र सादर करण्यासाठी कोणत्याही कारणास्तव मुदतवाढ देण्यात येणार नाही, अशी स्पष्ट तरतूद उमेदवारांच्या नियुक्तीच्या आदेशात नियुक्ती प्राधिका-यांनी नमूद करावी.

(कृ.मा.प.

<u>अर्हता</u> :- १) सामान्य प्रशासन विभाग, का.क्र.३९ यांच्या दि.७/८/२००१ च्या शा.नि.तील तरतूदीनुसार, शासन सेवेतील गट क मधील (वाहनचालक वगळून) संबंधीत पदावरील नियुक्तीसाठी संबंधीत उमेदवारांनी महाराष्ट्र नागरी सेवा (संगणक हाताळणी/वापराबाबतचे ज्ञान आवश्यक ठरविण्याबाबत) नियम १९९९ च्या नियम ३ अन्वये आवश्यक अर्हता म्हणून खालील 'अ' किंवा 'ब' प्रमाणे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.

अ) D.O.E.A.C.C. सोसायटीच्या अधिकृत " C.C.C." किंवा "O " स्तर किंवा "A" स्तर किंवा "B" स्तर किंवा "C" स्तर या पैकी कोणतीही एक परिक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र **किंवा,**

ब) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परिक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र.

३. सर्व नियुक्ती प्राधिका-यांनी गट क मधील (वाहन चालक वगळता) पदांवर परि.२ मध्ये नमूद केल्याप्रमाणे पदविधर/पदविकाधारक सुशिक्षित बेरोजगार उमेदवारांची नियुक्ती करताना या निदेशांचे कटाक्षाने पालन करावे.

४. हे आदेश सामान्य प्रशासन विभाग/का.१२ आणि सामान्य प्रशासन विभाग/का.३९ यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( द.दा.देशपांडे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री,राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
* प्रबंधक,उच्च न्यायालय,मूळ न्याय शाखा,मुंबई,
* प्रबंधक,उच्च न्यायालय,अपील शाखा,मुंबई,
* प्रबंधक,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई,
* प्रबंधक,लोकआयुक्त व उप लोकआयुक्त,मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,विधानभवन,मुंबई,
* सचिव,राज्य निवडणूक आयोग,मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व महापालिकांचे आयुक्त,
सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मुख्याधिकारी, नगर परिषदा/नगरपालिका,
संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय,मुंबई
उप सचिव,रोजगार व स्वयंरोजगार विभाग,नवीन प्रशासकीय भवन,१४ वा मजला,मुंबई-३२.
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती.

* पत्राने.

---